**यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगा नदीचे सहस्त्रकुंड ते (वढा) वर्धा नदीचे संगमापर्यंत अंदाजित लांबी २९१ कि.मी.लांबीची पूर रेषा निश्चित करण्याच्या कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-२०२३/ (प्र.क्र.१४/२०२३)/ सिं.व्य.(महसूल)

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५ मार्च २०२४

**वाचा :१)** शासन परिपत्रक क्र.एफडीडब्ल्यु-१०८९/२४३/८९/सिं.व्य.(कामे), दि.२.९.१९८९ व दि.२१/९/१९८९

**२)** शासन परिपत्रक क्र. पूरनि-२०१८/प्र.क्र.१८२/२०१८/ सिं.व्य.(महसूल),दि.३.५.२०१८ व दिनांक १० जुलै, २०१९

३) शासन निर्णय क्रमांक : पूसंभि -२०१९/(प्र.क्र.११५/१९) सिं.व्य.(म.)दि.३१/८/२०१९

**प्रस्तावना :-**

मा. नॅशनल ग्रीन ट्रिब्युनल वेस्टर्न झोन पुणे बेंच येथे याचिका क्र. २५/२०१४ श्री. सारंग यादवडकर व इतर यांनी दाखल केली आहे. उपरोक्त याचिकेमध्ये दिनांक ३/२/२०१६ च्या आदेशान्वये राज्यभरातील आवश्यक ११८८ किं.मी लांबी असलेल्या ठिकाणी दिनांक ३१/३/२०१७ पूर्वी पूररेषा आखणी करण्याबबत आदेशीत करण्यात आले आहे. राज्यभरातील पूररेषा आखणी पूर्ण न झाल्याने, मा. राष्ट्रीय हरित न्यायाधिकरण यांनी दिनांक ७/९/२०१८ पर्यत पूररेषा आखणीची कार्यवाही पूर्ण करण्याबाबत मुदत दिली होती सदर मुदत संपूनही अद्यापही पूररेषा आखणीची कार्यवाही पूर्ण झालेली नाही. याबाबत न्यायालयाने ताशेरे ओढले आहेत. याबाबत शासनस्तरावरुन वारंवार पत्रव्यवहार करुन पूरप्रवण भागाचा नकाशा करणे, पूररेषा आखणी करणे व सदर नकाशे संकेतस्थळावर विहित मुदतीमध्ये प्रसिध्द करण्याची कार्यवाही तातडीने करण्याबाबत सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना सुचना देण्यात आल्या आहेत. त्याअनुषंगाने क्षेत्रिय स्तरावरुन प्राप्त यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगा नदीचे सहस्त्रकुंड ते (वढा) वर्धा नदीचे संगमापर्यंत अंदाजित लांबी २९१ कि.मी. लांबीची पूर रेषा निश्चित करणे पूररेषा निश्चितीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

या शासन निर्णयान्वये यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगा नदीचे सहस्त्रकुंड ते (वढा) वर्धा नदीचे संगमापर्यंत अंदाजित लांबी २९१ कि.मी.लांबीची पूर रेषा निश्चित करण्याच्या कामास रु. ४८१.९५ लक्ष रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) शासन परिपत्रक क्रमांक : एफडीडब्लू-१०८९/२४३/८९/सिं.व्य.(कामे),दि. २/९/१९८९, दि. २१/०९/१९८९, दि. ०३/०५/२०१८ व दि. १०/०७/२०१९ मधील तरतुदीनुसार पूररेषा आखणी बाबत कामे पूर्ण करावी.

२) मेरी, नाशिक यांचे परिपत्रक, क्र. धसुस/ प्रशा - ४/ पीबी-४/१५८२, दिनांक १६/११/२०१५ मधील सुचनेनुसार पुढील कार्यवाही करावी.

३) शासनाच्या पूररेषा बाबतचे वेळोवेळी निर्गमित झालेल्या निर्णयांचे पालन करावे.

४) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

५) सदरच्या कामांचा कार्यारंभ आदेश काढण्यापासुन काम पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

**२)** प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च आय -५, ४७११ पूर नियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१ पूर नियंत्रण, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना भाग भांडवली अशंदान (०१) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७११ २८८३) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**३)** या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसूल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ५४ / सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे .

**४)** यवतमाळ जिल्ह्यातील पैनगंगा नदीचे सहस्त्रकुंड ते (वढा) वर्धा नदीचे संगमापर्यंत अंदाजित लांबी २९१ कि.मी.लांबीची पूर रेषा निश्चित करणे (जलशास्त्रीय अभ्यास, महत्तम पूर रेषेची संगणकीय प्रणालीद्वारे मोजणी, निषेधक (निळी) पूररेषा व नियंत्रण या रु. ४८१.९५ लक्ष रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१९०२१४०८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD


Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 19:11:54 +05'30'


**(सो.आ.गायकवाड)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय.

३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई.

४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.

५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई.

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई.

७) मा.उपमुख्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.

८) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.

९) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.

१०) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

११) सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.

१३) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर.

१४) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.

१५) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.

१६) आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई.

१७) अधीक्षक अभियंता, यवतमाळ पाटबंधारे प्रकल्प मंडळ, यवतमाळ.

१८) कार्यकारी अभियंता, निम्न पैनगंगा प्रकल्प विभाग, यवतमाळ.

१९) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.